**महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कार्यालयाकरिता सी.बी.डी बेलापूर येथील नियोजित मंजूर भूखंडावर इमारत बांधकामाच्या अनुषंगाने संरक्षक भिंत बांधण्याच्या कामास प्रशासकीय मंजूरी देणे.**

# महाराष्ट्र शासन

## सामान्य प्रशासन विभाग

### शासन निर्णय क्रमांकः मलोआ १११८/प्र.क्र.३२७ /(१)/का.०८

हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, विस्तार, मुंबई ४०० ०३२
दिनांक : २५ जानेवारी, २०१९

<u>वाचा :</u>

1. **शासन निर्णय क्रमांक : साबांज-२०१५/प्र.क्र.१५२/मिव्य-१ दिनांक ८ ऑगस्ट, २०१८ व दि.४ डिसेंबर,२०१८**
2. **महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे पत्र क्र. सीबीडी-०११८/सीआर-०१/२०१८/पाच, दिनांक ७ डिसेंबर, २०१८**

**<u>प्रस्तावना</u>**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कार्यालयासाठी सी.बी.डी.बेलापूर, नवी मुंबई येथील कोकण भवन शेजारील प्लॉट क्र.७ सेक्टर १० येथील १०,००० चौ.मी. भूखंडापैकी मेट्रो प्रकल्पासाठी देण्यात आलेला २००० चौ.मी. भूखंड वगळता उर्वरित भूखंड, संदर्भ क्र.१ मधील शासन निर्णयानुसार कायमस्वरुपी हस्तांतरित करण्यात आला आहे. सदर भूखंडावर संरक्षक भिंत बांधण्याच्या कामाकरिता कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, पनवेल यांनी सन २०१८-१९ च्या सूधारित दरसूचीच्या आधारे रू.८१,३४,४६६/- इतक्या रकमेचे अंदाजपत्रक सादर केले आहे

**शासन निर्णय** :-

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कार्यालयाकरिता इमारत बांधकामासाठी उपलब्ध करून दिलेल्या भूखंडावर संरक्षक भिंत बांधण्यासाठी येणा-या रू.८१,३४,४६६/-(रूपये एक्याऐंशी लाख चौतीस हजार चारशे सहासष्ट फक्त) इतक्या खर्चास शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक विअप्र २०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, दिनांक १७ एप्रिल, २०१५ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग १ उपविभाग ५ नियम क्रमांक १३४ नुसार प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय प्राधिकारानुसार व सार्वजनिक बांधकाम विभाग अनौपचारिक क्रमांक २/ईमा-३ दिनांक ५.१.२०१९ अन्वये दिलेली मान्यता विचारात घेवून खालील अटींच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे:-

१. अंदाजपत्राकातील काही बाबी दरसूची बाहयदर वापरून तयार केले असून त्यासाठी वापरलेले दरकरार कोणत्या स्तरावर मंजूर आहेत याची माहिती उपलब्ध करून दिलेली नाही तरी सदर कामास तांत्रिक मान्यता देण्याबाबत दरसुचीबाहय बाबींकरिता अधीक्षक अभियंता स्तरावर मंजूरी दरपृथ:करण वापरण्यात आले असल्याची खातरजमा करण्यात यावी.

२. सदर कामाची सुरूवात सन २०१८-१९ या आर्थिक वर्षापासून सूरू करून सदर बाबीवरील खर्च या वित्तीय वर्षातच करावा.

३. वरीलप्रमाणे प्रशासकीय मान्यता प्राप्त झालेल्या कामासाठी निधी प्राप्त झाल्यानंतर महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कार्यालयाकरिता इमारत बांधकामाच्या अनुषंगाने सदर भूखंडावर सरंक्षक भिंत बांधकामाचे काम तातडीने सूरू करून विहित मुदतीत पूर्ण करावे.

४. वरील काम सार्वजनिक बांधकाम विभागाकडूनच करून घेण्यात यावे. काम पूर्ण होताच याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करण्याची दक्षता महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने घ्यावी.

५. उपरोक्त कामासाठी विलंब अथवा इतर कोणत्याही कारणान्वये वाढीव खर्च होणार नाही याबाबत दक्षता घ्यावी.

२. सदर कामासाठी येणारा खर्च हा 'मागणी क्र. ए-३, २०५१ लोकसेवा आयोग,( १०२ )राज्य लोकसेवा आयोग, (००)(०१) महाराष्ट्र लोकसेवा आयोग अनिवार्य (२०५१ ००१३) १३- कार्यालयीन खर्च' या अंतर्गत सन २०१८-१९ या वित्तीय वर्षाकरिता मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०१२५१६३८५४२४०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajendra Pandurang Wagh

Digitally signed by Rajendra Pandurang Wagh
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9e4468a63fe9f9f2a565a0790f46e3c14a3715b2370430433845720a9c4c8107, serialNumber=7adb1868a49b8719e27d3453044671a8ceddbd04af26dd2089ed03e6b1bd92bd, cn=Rajendra Pandurang Wagh
Date: 2019.01.25 17:29:04 +05'30'

**(राजेंद्र वाघ)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग.
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई.
३. महाव्यवस्थापक, शहर व औद्योगिक विकास महामंडळ (महाराष्ट्र) मर्या., मुंबई.
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई /निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
५. आहरण व संवितरण अधिकारी, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
६. अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, कोकण भवन, नवी मुंबई.
७. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, पनवेल.
८. सार्वजनिक बांधकाम विभाग, (कार्यासन इमा-३/मिव्य १), मंत्रालय, मुंबई
९. वित्त विभाग, (विनियम), मंत्रालय, मुंबई
१०. सामान्य प्रशासन विभाग (कार्यासन-२५), मंत्रालय, मुंबई.
११. निवड नस्ती ( का.८)